शेलबारी लघु प्रकल्प ता साक्री जि धुळे दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता ..

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ४५६ /२०१४)/सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: १०.०९.२०१४

**पहा :-**

**संदर्भ १)कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र जा क्र कासं/तापाविम /प्रशा ६/ ३७०८/सन २०१४ दिनांक २.८.२०१४**

**प्रस्तावना**

शेलबारी लघु प्रकल्प सन १९८१-८२ साली पूर्ण झालेला आहे. शेलबारी लघु प्रकल्पाचे पाणलोट क्षेत्र २१.२४ चौ.कि.मी. असून प्रकल्पाचा उपयुक्त पाणीसाठा १.३५६ दलघमी आहे. शेलबारी लघु प्रकल्पाची लांबी ३६३ मीटर असून ते मातीचे धरण आहे. प्रकल्पास डावा कालवा असून त्याची लांबी २४९५ मी. आहे..शेलबारी लघु प्रकल्पाचे एकूण सिंचनक्षेत्र १८९ हेक्टर आहे. सदर लघु प्रकल्पाचे पाणलोट क्षेत्र वन विभागाचे असून हा प्रकल्प मागील ५ वर्षा पासून पूर्ण संचय पातळीपर्यंत भरत आहे.शेलबारी लघु प्रकल्पावर मागील ८ वर्षामध्ये रब्बी हंगामात सिंचन झालेले आहे. सदर लघु प्रकल्पाच्या डाव्या कालव्यावर सिंचन व्यवस्थापनेसाठी हस्तांतराच्या वेळी एकूण ६ वितरीका होत्या. परंतु गेल्या १०-१२ वर्षापासून वितरीका क्र. ५ व ६ च्या सिंचनक्षेत्रास पाणी न मिळाल्याने सदर दोन्ही वितरीका गाळाने पुर्णपणे भरल्या आहेत. त्यामुळे दोन्ही वितरीकांना मोठ्या प्रमाणात दुरूस्तीची आवश्यकता आहे. सध्या फक्त ४ वितरीकांवर सिंचन होते.शेलबारी लघु प्रकल्पाचे सर्व सिंचनक्षेत्र आदिवासी भागात येत असून सर्व लाभधारक आदिवासी आहेत. परंतु कालवा व वितरीका पूर्ण वहनक्षमतेला वाहत नसल्याने सिंचनास त्रास होऊन पुरेसे सिंचन होत नाही. सदर अंदाजपत्रकात शेलबारी धरणाचे मजबुतीकरण व कालव्याचे विशेष दुरुस्तीचे कामे प्रस्तावित आहे. तसेच सदर अंदाजपत्रकात पाणी वापर संस्था स्थापनेच्या दृष्टीने प्रवाह मापकांची (CTF) तरतूद करण्यांत आली आहे. सदर कालव्याचे नुतनीकरणाचे काम केल्यास शेलबारी लघु प्रकल्पाखाली १८९ हेक्टर इतके संकल्पित सिंचन होऊ शकेल व पाणी वापर संस्थाना हस्तांतर करणे शक्य होईल हे विचारात घेता सदरहू कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय**

**या शासन निर्णयाव्दारे शेलबारी लघु प्रकल्प रु ५४.५२ लक्ष (रु ४९.०८ लक्ष कामानिमित्त व रु ४.९१ लक्ष अनुषंगिक खर्च व विमा रु ०.५३ लक्ष) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे..**

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततेबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (mile stones)

निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) यांत्रिकी संघटनेकडून शक्य असलेले कामे यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावे

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

६) दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेवून तांत्रिक मान्यता प्रस्ताव मंजूर करण्यात यावा.

या कामावर होणारा खर्च या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) यासाठी भाग भांडवली अंशदान १२ (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ जे १८५) या मुख्य लेखाशिर्षखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ५७ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१८१५४६२५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.09.10 18:28:36 +05'30'

( य.का.भदाणे )
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ नाशिक
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ४५६ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक १० .०९.२०१४चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत किंमत( लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १) | कामावरील खर्च | ४९.०८ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | ४.९१ |
| ३) | विमा | ०.५३ |
| | एकूण | ५४.५२ |

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.09.10 18:29:07 +05'30'

( य.का.भदाणे )
शासनाचे अवर सचिव